**नियोजन आणि विकास प्रक्रियेत “विभागीय आयुक्त”(Divisional Commissioner) यांनी “पदसिध्द अतिरिक्त विकास आयुक्त (Ex-officio Additional Development Commissioner)” म्हणून भूमिका पार पाडणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**नियोजन विभाग,**

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.४०/का-१४११,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दि. २५ फेब्रुवारी, २०२२

संदर्भ: १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. डीव्हिआय-१०८०/सी.आर.०९/डी-१७, दि.१० एप्रिल, १९८०,
२) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र. एसईवाय-१०८५/सी.आर.१७/ डीपीआरजी-१, दि.१६ एप्रिल, १९८५,

**प्रस्तावना :-**

नियोजन विभागाकडून आर्थिक वर्षाकरिता सर्व प्रशासकीय विभागांशी विचार विनिमय करुन वार्षिक कार्यक्रमाची आखणी करण्यात येते. या आखणीअंतर्गत (i) अनुसूचित जाती घटक कार्यक्रम(Scheduled Caste Component Scheme), (ii) आदिवासी घटक कार्यक्रम(Tribal Component Scheme), (iii) जिल्हा वार्षिक योजना (District Annual Plan) व (iv) राज्यस्तर सर्वसाधारण कार्यक्रम (State General Scheme) याकरिता निधीचे वितरण करण्यात येते. याकरिता नियोजन विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांना राज्यस्तरावर “विकास आयुक्त(Development Commissioner)” म्हणून नियुक्त करण्यात आले असून नियोजन विभाग शासन निर्णय क्र.डीव्हिआय-१०८०/सी.आर.०९/डी-१७, दि.१० एप्रिल, १९८० अन्वये “विभागीय आयुक्त”(Divisional Commissioner) यांना त्यांचे महसूली विभागाकरिता “पदसिध्द अतिरिक्त विकास आयुक्त (Ex-officio Additional Development Commissioner)” म्हणून नियुक्त करण्यात आले आहे.

२. महसूली विभाग स्तरावर सर्वसाधारण कार्यक्रम (General Scheme) अंतर्गत प्रशासकीय विभागांच्या विविध कार्यक्रम/योजना यांची अंमलबजावणी केली जाते. तथापि, क्षेत्रिय स्तरावर अशा कार्यक्रम/योजना यांची अंमलबजावणी करताना संबंधित प्रशासकीय विभागांमध्ये उद्भवणारे समन्वयाचे विषय किंवा जिल्हा पातळीवर उद्भवणाऱ्या स्थानिक समस्यांची वेळेवर दखल घेऊन त्याचे निराकरण करण्याची प्रभावी भूमिका बजाविण्याकरिता विभागीय आयुक्त (Divisional Commissioner) यांची “पदसिध्द अतिरिक्त विकास आयुक्त” (Ex Officio Additional Development Commissioner) म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. या पार्श्वभूमीवर “विभागीय आयुक्त” (Divisional Commissioner) यांचेकडून पदसिध्द अतिरिक्त विकास आयुक्त (Ex Officio Additional Development Commissioner) म्हणून त्यांचे महसूली विभागामध्ये सर्वसाधारण कार्यक्रम (General Scheme) अंतर्गत

समाविष्ठ विविध कार्यक्रम/योजना यांची कालबध्द अंमलबजावणी होऊन अपेक्षित परिणाम व फलनिष्पत्ती
(Output & Outcomes) साध्य करण्याकरिता संबंधित प्रशासकीय विभागाचे प्रादेशिक प्रमुख (Regional Heads) यांची किमान एक त्रैमासिक समन्वय व आढावा बैठक (Quarterly Coordination Cum Review Meetings) आयोजित करण्याची प्रथा पुनरुज्जीवित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

नियोजन विभाग शासन निर्णय क्र.डीव्हिआय-१०८०/सी.आर.०९/डी-१७, दि.१० एप्रिल, १९८० अन्वये "विभागीय आयुक्त"(Divisional Commissioner) यांना त्यांचे महसूली विभागाकरिता "पदसिध्द अतिरिक्त विकास आयुक्त (Ex-officio Additional Development Commissioner)" म्हणून नियुक्त करण्यात आले आहे.

२. महसूली विभाग स्तरावर सर्वसाधारण कार्यक्रम (General Scheme) अंतर्गत समाविष्ट विविध कार्यक्रम/योजना यांची प्रत्यक्ष अंमलबजावणी करताना उद्भवणारे समन्वयाचे विषय व जिल्हा पातळीवर उद्भवणाऱ्या समस्यांची वेळेवर दखल घेऊन त्याआधारे कार्यक्रम/योजना यांची कालबध्द अंमलबजावणी होऊन अपेक्षित परिणाम व फलनिष्पत्ती (Output & Outcomes) साध्य करण्याकरिता संबंधित प्रशासकीय विभागाचे प्रादेशिक प्रमुख (Regional Heads) यांची किमान एक त्रैमासिक समन्वय व आढावा बैठक (Quarterly Coordination Cum Review Meetings) आयोजित करण्याची प्रथा पुनरुज्जीवित करावी, अशा सूचना या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत.

३. महसूली विभागामध्ये प्रशासकीय विभागांकडून सर्वसाधारण कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या योजना/कार्यक्रम/कामांचा तपशील संबंधित प्रादेशिक प्रमुख यांनी वेळोवेळी विभागीय आयुक्तांना अवगत करावा. त्यानुसार महसूल विभागामध्ये सर्वसाधारण कार्यक्रम (General Scheme) अंतर्गत समाविष्ट विविध योजना/कार्यक्रम यांच्या कालबध्द अंमलबजावणीसाठी संबंधित प्रादेशिक प्रमुख (Regional Heads) यांच्याकडून जिल्हास्तरावर उपस्थित होणारे महत्त्वाचे विषय संकलित करुन विभागीय आयुक्त यांनी पदसिध्द अतिरिक्त विकास आयुक्त (Ex Officio Additional Development Commissioner) म्हणून किमान एक त्रैमासिक आढावा बैठक (Quarterly Coordination Cum Review Meetings) आयोजित करावी. याकरिता आवश्यकतेप्रमाणे जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनाही निमंत्रित करावे. सर्व प्रादेशिक प्रमुख (Regional Heads) यांच्या त्रैमासिक बैठकी (Quarterly Coordination Cum Review Meetings) संदर्भात विषयसूची निश्चित करणे, बैठकीचे इतिवृत्त तयार करणे व प्रशासकीय विभागाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांना महत्त्वाच्या निर्णयाबाबत अवगत करणे, ही सर्व जबाबदारी "उप आयुक्त (नियोजन) (Deputy Commissioner-Planning)" यांचेकडे सोपवावी.

४. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२२०२२८१२१९४१२२१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SUNIL SHANKAR SHINDE

Digitally signed by SUNIL SHANKAR SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=1c3a34f1f8dae5c5fcd9f88d8c5d7ec3123390afeea4b4c5c7aa39a9eee13124,
pseudonym=099046B2BC3D8F0E787980C4F643F6396FFF3408,
serialNumber=59F95E2C0839698587915901 2B3E6286A5D0215315EA137ED8975A37DA2D5F53, cn=SUNIL SHANKAR SHINDE
Date: 2022.02.28 12:23:30 +05'30'

**( सुनिल शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
५. मा. उप सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
७. सर्व सन्माननीय सदस्य, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
८. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
९. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई,
१०. मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) विभाग यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. सर्व मा. मंत्री महोदय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. सर्व मा. राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
१४. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
१५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहायक,
१६. महासंचालक, माहिती जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
१८. सर्व विभागीय आयुक्त/ सर्व जिल्हाधिकारी,
१९. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
२०. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/नगरपरिषदा,
२१. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२२. वित्त विभाग (व्यय -८ / अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई,
२३. उप सचिव (का-१४१२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२४. सह सचिव / उप सचिव / अवर सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२५. निवडनस्ती, कार्यासन-१४११, नियोजन विभाग,